**राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) यांना "कार्यालय प्रमुख", “आहरण व संवितरण अधिकारी” तसेच “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः स्वमअ-२०१५/प्र.क्र.१७५/नवि-३४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक: ०६ ऑगस्ट, २०१५

**वाचा-**

१) शासन निर्णय क्रमांक: नगर विकास विभाग स्वभाअ-२०१५/प्र.क्र.२३/नवि-३४ दिनांक २४ एप्रिल २०१५

२) शासन निर्णय क्रमांकः नगर विकास विभाग स्वभाअ-२०१५/प्र.क्र.२३/नवि-३४ दिनांक १५ मे २०१५

**प्रस्तावना-**

स्वच्छ भारत अभियानाच्या धर्तीवर स्वच्छ महाराष्ट्र अभियानाच्या अंमलबजावणीस शासनाने संदर्भाधीन क्र. २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे. सदर अभियानाच्या अंमलबजावणीसाठी नगर विकास विभागाच्या अंतर्गत स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) संचालनालयाची निर्मिती संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये करण्यात आलेली आहे. या संचालनालयाचे प्रमुख म्हणून "राज्य अभियान संचालक" हे आहेत. सदर शासन निर्णयान्वये राज्य अभियान संचालनालयात सह सचिव /उप सचिव दर्जाचे अधिकारी राज्य अभियान संचालक म्हणून नियुक्त करण्याची तरतूद करण्यात आली आहे. संचालनालयातील कामकाजाच्या दृष्टीने या राज्य अभियान संचालकांना "कार्यालय प्रमुख", “ आहरण व संवितरण अधिकारी” तसेच “ नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) च्या अंमलबजावणीसाठी नगर विकास विभागाच्या अंतर्गत स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) संचालनालयाची निर्मिती करण्यात आलेली आहे. या संचालनालयाचे प्रमुख म्हणून "राज्य अभियान संचालक" हे कार्यरत आहेत.

२. "राज्य अभियान संचालक", स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) संचालनालय हे वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-एक मधील अ. क्र. ३ नियम क्रमांक २ मधील अटी व शर्तींची पूर्तता करीत असल्यामुळे सदर नियमांच्या अधीन राहून प्रशासनिक

विभागास असलेल्या अधिकारानुसार "राज्य अभियान संचालक", स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) संचालनालय, मुंबई यांना "कार्यालय प्रमुख" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. त्याचप्रमाणे "राज्य अभियान संचालक", स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) संचालनालय, मुंबई यांना “आहरण व संवितरण अधिकारी” तसेच “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०६१२४७४३८२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhakar Dnyandeo Bobade

Digitally signed by Sudhakar Dnyandeo Bobade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2e4705465b9bdfd5b38b2d36aae83659869796cb8cc2aefbc550989feec27db1, cn=Sudhakar Dnyandeo Bobade
Date: 2015.08.06 12:52:09 +05'30'

**( सुधाकर ज्ञा. बोबडे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव (नगरविकास-२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
४. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
६. अधिदान व लेखाधिकारी, फोर्ट, मुंबई.
७. अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे (पू.), मुंबई.
८. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई.
१०. मुख्य लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
११. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
१२. उप सचिव (नवि-४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. उप सचिव (नवि-५), रोख शाखा, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) संचालनालय, मुंबई.
१५. निवड नस्ती (नवि-३४)